**पुनर्रचित राष्ट्रीय बांबू अभियान (National Bamboo Mission) च्या अंमलबजावणीसाठी सुधारीत राज्यस्तरीय कार्यकारी समिती (SLEC) गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.बांबूसा-२०१८/प्र.क्र.२२८/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक :- ०६ नोव्हेंबर, २०२०**

वाचा :-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई क्रमांक:बांबुसा-२०१८/प्रक्र.२२८/फ-९ , दिनांक ०६.०७.२०१८
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई क्रमांक:बांबुसा-२०१८/प्र.क्र.२२८/फ-९, दिनांक ३१.०७.२०१८
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई क्रमांक:बांबुसा-२०१८/प्र.क्र.२२८/फ-९, दिनांक २९.०८.२०१८
४) भारत सरकार, कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालय, कृषी, सहकार व शेतकरी कल्याण विभाग (एनआरएम विभाग, राष्ट्रीय बांबू अभियान), नवी दिल्ली यांचे पत्र क्र.४४-२२/२०१८-एनबीएम (पीटी-२)(एफटीएस ७५१५०), दिनांक २८.०८.२०१९
५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.व्यसं/मबांविमं /प्र.क्र.५३/१८-१९/१७२/२०-२१, दिनांक १८.०६.२०२० व क्र.व्यसं/मबांविमं/प्र.क्र.५३/१८-१९ /३१४/२०-२१, दिनांक १४.०७.२०२०

प्रस्तावना :-

राज्यात बांबू मिशनची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये वन विभाग हा केंद्रस्थ (नोडल) विभाग घोषित केला तसेच व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बाबू विकास मंडळ, नागपूर यांची बांबू अभियान संचालक (Missions Director) यांची नियुक्ती केली आहे.

संदर्भ क्र.२ व ३ च्या शासन निर्णयान्वये पुनर्रचित राष्ट्रीय बांबू मिशनकरीता मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय कार्यकारी समिती (SLEC) गठित करण्यात आलेली आहे. आता केंद्र शासनाच्या संदर्भ क्र.४ दिनांक २८.०८.२०१९ च्या पत्रान्वये राष्ट्रीय बांबू अभियानाच्या सुधारित मार्गदर्शक तत्वानुसार सुधारित राज्यस्तरीय कार्यकारी समिती गठीत करण्याबाबत निर्देश निर्गमित केलेले आहेत. यामध्ये आता मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्याऐवजी प्रधान सचिव (वने) यांचे अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय कार्यकारी समिती गठीत करण्याबाबत निर्देशित

केले आहे. त्यानुसार सुधारीत राज्यस्तरीय कार्यकारी समिती (SLEC) गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सदर पुनर्रचित राष्ट्रीय बांबू मिशनकरीता खालीलप्रमाणे सुधारित राज्यस्तरीय कार्यकारी समिती (State Level Executive Committee) गठीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | समिती सदस्याचे पदनांम | पद |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (वने) | अध्यक्ष |
| २ | सचिव (कृषी विभाग), किंवा त्यांचे उप/सह सचिव दर्जाचे प्रतिनिधी | सदस्य |
| ३ | प्रधान सचिव (आदिवासी विकास विभाग) किंवा त्यांचे उप/सह सचिव दर्जाचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव (उद्योग विभाग) किंवा त्यांचे उप/सह सचिव दर्जाचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५ | अपर मुख्य सचिव (वित्त विभाग) किंवा त्यांचे उप/सह सचिव दर्जाचे प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | अपर मुख्य सचिव (ग्राम विकास विभाग) किंवा त्यांचे उप/सह सचिव दर्जाचे प्रतिनिधी | सदस्य |
| ७ | सचिव (माहिती व तंत्रज्ञान) किंवा त्यांचे उप/सह सचिव दर्जाचे प्रतिनिधी | सदस्य |
| ८ | प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर | सदस्य |
| ९ | भारत सरकार, कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालय, कृषी, सहकार व शेतकरी कल्याण, विभाग यांचे नामनिर्देशीत अधिकारी | सदस्य |
| १० | संचालक, बांबू मिशन तथा व्यवस्थापकीय संचालक,<br>महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर | सदस्य<br>सचिव |
| **अ) बांबू क्षेत्रातील दोन तज्ञ (अशासकीय सदस्य)** | | |
| ११ | श्री.संदिप थेंग, ऐरोली, नवी मुंबई | अशासकीय सदस्य |
| १२ | श्री.मावा थुर रामचंद्र सुरेश, मुख्य कार्यकारी अधिकारी, सायकल ब्रँड अगरबत्ती, बंगलोर | अशासकीय सदस्य |
| **ब) बांबू शेतकऱ्यांची संघटना /समितीचा एक प्रतिनिधी (अशासकीय सदस्य)** | | |
| १३ | श्री.मनोज वसंतराव देवरे, दिग्रस, यवतमाळ | अशासकीय सदस्य |

उपरोक्त **अशासकीय सदस्यांचा कार्यकाल** सदर आदेशापासून २ वर्षा पर्यंत असेल.

**समितीचे कार्यक्षेत्र**

१. राज्याच्या बांबू मिशनच्या कृती आराखडा तयार करणे व राष्ट्रीय स्तरावरील कार्यकारी समितीच्या मान्यतेसाठी सादर करणे.

२. केंद्र शासनाकडून मंजूर झालेल्या निधीचे संबंधित यंत्रणांना वितरीत करणे.
३. मिशनच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी योग्य समन्वय / संनियंत्रण व मूल्यमापण करणे.

उपरोक्त समितीतील अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या शासन निर्णय दिनांक ०३.०३.२०१० मधील परिच्छेद क्रमांक १२ अन्वये प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय असेल. अशासकीय सदस्यांना विमान प्रवास व रेल्वेच्या वातानुकूलित प्रथम वर्गाचा प्रवास अनुज्ञेय असणार नाही. तसेच अशासकीय सदस्यांना बैठक भत्ता शासन निर्णय, वित्त विभाग दिनांक २४.०५.२०१२ अन्वये केलेल्या सुधारणेस अनुसरुन सुधारीत दराने बैठक भत्ता अनुज्ञेय असेल.

सदर राज्यस्तरीय समिती केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यात “राष्ट्रीय बांबू अभियानाची” प्रभावी अंमलबजावणी करण्याकरिता कार्यरत असेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०११०६१४४०५०१३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्रांचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJENDRA PRAKASH NARWANE

Digitally signed by GAJENDRA PRAKASH NARWANE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=088951d0088e627aa56c9ab088add1677b8ac27d637c5cdf80b730f756dce9e8, cn=GAJENDRA PRAKASH NARWANE
Date: 2020.11.06 14:43:49 +05'30'

**( गजेंद्र नरवणे )**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
४. सर्व मा.मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मुख्य सचिव यांचे सहसचिव
६. अपर मुख्य सचिव (वित्त)
७. अपर मुख्य सचिव(नियोजन)
८. अपर मुख्य सचिव(कृषी)
९. प्रधान सचिव(उदयोग)
१०. प्रधान सचिव(ग्रामविकास)
११. प्रधान सचिव(आदिवासी विकास)
१२. प्रधान सचिव (वने)
१३. प्रधान मुख्य वनसंरक्षक(वन बल प्रमुख), नागपूर
१४. प्रधान मुख्य वनसरक्षक (सामाजिक वनीकरण), पुणे

१५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापक), नागपूर
१६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन व प्रशिक्षण ), पुणे
१७. सर्व विभागीय आयुक्त
१८. सर्व मुख्य वनसंरक्षक
१९. आयुक्त (कृषी) महाराष्ट्र राज्य, पुणे
२०. संचालक फलोत्पादन, महाराष्ट्र राज्य,पुणे
२१. संचालक, खादी व ग्रामोउदयोग मंडळ, मुंबई
२२. संचालक, उदयोग संचलनालय, मुंबई
२३. सर्व जिल्हाधिकारी
२४. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद
२५. व्यवस्थापकीय संचलाक, महाराष्ट्र बांबु विकास मंडळ, नागपूर
२६. महालेखापाल (लेखापरिक्षा ) महाराष्ट्र १/२, मुंबई व नागपूर
२७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई व नागपूर
२८. सर्व जिल्हा कोषगार अधिकारी
२९. सर्व मंत्रालयीन विभाग
३०. मुख्य वनंसरक्षक(मंत्रालय), मुंबई
३१. सर्व सह सचिव / अवर सचिव/ कार्यासन अधिकरी, महसूल व वन विभाग, (वने), मंत्रालय, मुंबई
३२. कार्यासन फ-९ , महसूल व वन विभाग, मंत्रालय , मुंबई (निवडनस्ती)